# वॉलरस-सील द्वीप

एवलिन शॉ

चित्र: चेरिल पपी

मराठी: अश्विनी बर्वे





नोव्हेंबरमध्ये थंडी असते. तेव्हा सूर्य बहुतेकवेळा ढगांमध्ये लपलेला असतो.



हवेमुळे समुद्रात पांढरा फेस तयार होतो.

मोठ्या लाटा एका छोट्या द्वीपावर येऊन धडकतात.

हे बेट प्रशांत महासागरामध्ये वसलेले आहे.

या बेटाचे नाव एनो-न्यूवो आहे.

सीगल (समुद्री-पक्षी) आणि सील खडकांवर बसलेले आहेत.

पण बाकी वाळूचा समुद्र तट खाली आहे.

लवकरच समुद्रावर एक मोठी लाट उसळली.

मग एक मोठा प्राणी वाळूवर येऊन पडला.

तो एक नर-सील आहे.

तो चौदा फुट लांब आहे.

त्याच्याकडे पोहण्यासाठी पर आहेत.

पण तो त्यावर चालू शकत नाही.

तो आपले शरीर समुद्राच्या वाळूवर खेचत आणतो.



लवकरच समुद्रातून अजून एक सील बाहेर येतो. मग दुसरा, आणि तिसरा.आता समुद्र किनारी पन्नास एक सील आराम करतांना दिसतात. ते सर्व नर सील आहेत.



त्यांना सांड (बुल) म्हटले जाते. दरवर्षी नोव्हेंबर मध्ये या बेटावर सांड येतात. ते मादयांची वाट बघत असतात.





म्हातारा नर, तरुण सांडापेक्षा मोठे असतात. म्हाताऱ्या नराचे नाक, तरुण सांडाच्या नाकापेक्षा मोठे असते.

नर एकमेकांचा पाठलाग करतात आणि एकमेकांना धक्के देतात.

ते आपल्या मोठ्या नाकाने जोरात आवाज करतात. अनेक वेळा नर एकमेकांना चावतात.



नेहमी एक नर गेल्यावर लढाई संपते.

छोटा नर सामान्यपणे लढाईत हरतो.



जेव्हा ते भांडत नसतात तेव्हा ते झोपलेले असतात.

एक महिना निघून जातो. आता डिसेंबर सुरु होतो. तेव्हा मादया येतात.

समुद्रातून एक, दोन, वीस, दोनशे मादया बाहेर येतात.

त्या नरापेक्षा लहान असतात.

त्यांचे नाक पण छोटे असतात.





लवकरच मादया पिल्लांना जन्म देते.
प्रत्येक मादी एका पिल्लाला जन्म देते.




ती एका नर पिल्लाला जन्म देते.

वैज्ञानिक त्या पिल्लाचे नाव बेसिल ठेवतात.

त्यांनी त्याच्या परावर एक टॅग लावला आहे.

नंतर ते त्यावर त्याचे नाव लिहणार आहेत.

बेसिल काळा, चमकदार लांब आणि बारीक आहे.

त्याचे पर मोठे आहे.

एक मादी, दुसऱ्यांच्या तुलनेत मोठी आहे.

सीलचा अभ्यास करणाऱ्या वैज्ञानिकांनी तिचे नाव रिटा ठेवले आहे.

त्यांनी हेअर-डाय शिंपडून तिच्या शरीरावर तिचे नाव लिहले आहे.

रिटा सहा वर्षाची आहे.





बेसिल जन्मतःच भुकेला होता.

त्याचे वजन जवळपास पन्नास पौंड आहे.

त्याला लगेच दूध चोखायचे होते.

तो रीटाच्या मोठ्या पोटावर निपल शोधतो.



निपल शोधण्यासाठी बेसिलला एक तास लागतो. मग तो आपल्या आईचे दूध पितो.

बेसिल रोज खूप सारे दूध पितो.

रोज त्याचे दहा पौंड वजन वाढते.

हळूहळू त्याचे वजन वाढत आहे.

तीन आठवड्यात बेसिलचे वजन
२५० पौंड होते.






एक दिवस सकाळी,एका मोठ्या मादीच्या मागे बेसिल हरवतो.

रीटाला तो दिसत नाही. ती त्याला शोधते.

मग रीटाला एक पिल्लू दिसले.

तसे तर सर्व पिल्ले एकसारखे दिसतात.

पण त्यांचा गंध समान नसतो.

रीटा त्या पिल्लाला हुंगते.

पण त्याला  बेसिलचा गंध येत नाही.

रीटा जोरजोरात आवाज करते.

आहग!

मग ती पिल्लाला चावते. पिल्लू रडते.
ते पिल्लाची आई ऐकते.

ती खूप नाराज होते. मग ती पण
जोरजोरात आवाज करू लागते.

आहग!



ती रीटाशी येऊन भांडते. कारण रीटा तिच्यापेक्षा मोठी आहे. म्हणून रीटा लढाई जिंकते.






बेसिलला शोधून शोधून रीटा थकते. मग ती झोपून जाते.

एक भुकेले पिल्लू रीटाला झोपलेले बघते.
ते तिचे दूध पिऊ लागते.मग

बेसिल, रीटाकडे बघतो, तो हि भुकेला
आहे. पिल्ले नेहमी भुकेली असतात.आता
दोन पिल्ले रीटाचे दूध पित आहे.






रीटाला जाग येते. ती दोन्ही पिल्लांना हुंगते.
ती दुसऱ्या पिल्लाला चावण्यासाठी वळते.
तेव्हा ते पिल्लू स्वतःच तिथून निघून जाते.

बेसिल आपल्या आईच्या जवळ झोपतो.

अचानक बेसिल, रीटाचा आवाज ऐकतो.

एक मोठा नर रीटाकडे धावत येत असतो.






इतर मादा त्याच्या रस्त्यातून बाजूला होतात.

काही  पिल्ले लवकर त्याच्या रस्त्यातून बाजूला होऊ शकत नाही.

ते नराच्या शरीराखाली येऊन मरतात.

मोठा नर, बेसिलला दूर ढकलून देतो.




बेसिल आपल्या आईजवळ जाण्यासाठी रडतो. नर आणि रीटा एकमेकांबरोबर संभोग करतात.

मग तो निघून जातो.

बेसिल आपल्या आईजवळ परत येतो. तो आईचे थोडे दूध पिऊन खुश होतो.



चार आठवड्यात बेसिलचे वजन जवळपास ३५० पौंड होते. आता तो खूप मोठा झाला आहे. म्हणून त्याची आई त्याला सोडून निघून जाते.

एक दिवस सकाळी बेसिल गाढ झोपलेला असतो. तेव्हा रीटा समुद्रात निघून जाते.



ती पोहत बेटावरून दूर निघून जाते.



पुढच्या वर्षी डिसेंबरमध्ये ती परत येईल.

तेव्हा ती परत एका नवीन पिल्लाला जन्म देईन.

ती संभोग करेन. पण बेसिल तिला परत कधी बघू शकणार नाही. त्याची आई निघून गेली आहे. जेव्हा बेसिलला जाग येते तेव्हा तो जोरजोरात ओरडतो. तो खूप भुकेला आहे. आता त्याची आई नाही. त्याच्याजवळ पिण्यासाठी दूध नाही.



बाकी सर्व आयापण समुद्रात निघून गेल्या. सगळे नरही निघून गेले. आता द्वीपावर फक्त पिल्ले राहिले.

बेसिल स्वतः सरपटत दुसऱ्या पिल्लांकडे गेला. ते सगळे खूप मोठे होते. त्याचे केस चांदीच्या रंगाचे होते.



पिल्लांना "वीनर“ म्हणतात कारण आता ते दूध पीत नाही.

"वीनर" दोन महिन्यांपर्यत द्वीपावर राहिले. त्या दरम्यान ते खाणे खात नाही. मग ते बारीक होत जातात. प्रत्येक सकाळी "वीनर“ आपले शरीर समुद्राच्या किनाऱ्यापर्यंत खेचत नेतात.

बेसिल त्यांच्याबरोबर जातो.





सगळ्यात आधी तो पाण्याच्या छोट्या छोट्या तलावात डुबकी मारतो. मग पाण्याचे शिंतोडे उडवतो. पण तो पाण्याच्या आत आपला चेहरा घालत नाही. इथे तो अनेक गोष्टी शिकतो. तो समुद्री शेवाळ आणि खडकांना हुंगतो.

तो उडणाऱ्या पक्षांना बघतो.

समुद्र तटावर "वीनर" एकमेकांबरोबर खेळतात. ते आपले डोके वर उचलतात. ते एकमेकांबरोबर भांडण्याचे नाटक करतात. कधीकधी ते पडतात आणि समुद्र तटावर पडतात.



जसजसे दिवस जातात तसतसे "वीनर" मध्ये हिंमत येऊ लागते.

बेसिलमध्ये पण हिंमत येते. आता तो आपला चेहरा पाण्यात घालतो. मग तो खोल पाण्यात जातो.





तो पोहतो. तो स्वतःच पोहायला आणि खोलवर डुबकी मारायला शिकला आहे. त्याला शिकवण्यासाठी न याची आई होती न वडील होते.





जेव्हा तो तीन महिन्यांचा होतो तेव्हा बेसिल द्वीप सोडण्यास तयार झाला.

आता सर्व "वीनर" समुद्रात राहण्यास तयार होते.

एक-एक करून पोहत ते दूर निघून जातात. आता त्यांना स्वतःलाच मासे पकडणे आणि ते खाणे शिकायला लागणार आहे.

त्यांना मारणाऱ्या व्हेलपासून सावध राहावे लागेल. व्हेल सीलच्या पिल्लांना खातो.शार्कसुद्धा सीलचे पिल्ले खातो. पण काही "वीनर“ त्यांच्यापासून वाचतात.





काही "वीनर“ चांगल्या पद्धतीने मासे पकडायला शिकत नाही. ते भुकेले मरतात. बेसिल समुद्रात खूप सारे मासे पकडतो.

पण तो प्रत्येकवेळी पाण्याच्या खाली राहू शकत नाही. कारण तो एक मासा नाही. तो समुद्रात राहणारा एक सस्तन प्राणी आहे. सस्तन प्राणी हवेत श्वास घेतात. बेसिलला हवेत श्वास घेण्यासाठी आपले नाक बाहेर काढावे लागते.







वर्षे निघून जातात.आता बेसिल एक तरुण नर आहे. तो सात वर्षाचा आहे. तो खूप मोठा आहे. आता तो मादीबरोबर संभोग करायला तयार आहे.





नोव्हेंबरमध्ये बेसिल त्या द्वीपावर जातो जिथे त्याचा जन्म झाला होता.

तो एनो-न्यूवो द्वीपावर परत येतो.

वैज्ञानिक त्याच्यावर परत एक खुण करतात.

तो मादया येईपर्यंत समुद्र तटावर वाट बघतो. त्या दरम्यान इतर नरांना धक्का देत तो त्यांचा पाठलाग करतो.





तो असे प्रत्येक वर्षी अनेक वर्षे करेल.
तो अनेक मादांच्या बरोबर संभोग करेल.
बेसिल १०० सीलांचा वडील होऊ शकतो.

अंत